रोटरी साऊथ एशियन सोसायटी (RSAS) च्या सहकार्याने राज्यातील शाळा डिजिटल करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक: सीएसआर-४३१६/(७९/२०१६)/प्रशिक्षण**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : १९ एप्रिल, २०१७.

वाचा:-

१) प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रम अंमलबजावणी, शासन निर्णय दि.२२ जून, २०१५

२) जलद प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र कार्यक्रम, शासन परिपत्रक दि.०९ जानेवारी, २०१७

**शासन परिपत्रक :-**

राज्यातील शाळांतील शिक्षणाचा दर्जा व गुणवत्ता वाढविण्यासाठी शासन स्तरावरुन संदर्भ क्र.२ येथे नमूद जलद प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र संदर्भातील शासन परिपत्रक निर्गमित करण्यात आले आहे. सदर परिपत्रकातील मुद्या क्र.२ मध्ये डिजीटल शाळांविषयी उल्लेख करण्यात आला असून, राज्यातील १०० टक्के शाळांमधील १०० टक्के वर्ग डिजीटल होणेबाबतचा मानस व्यक्त करण्यात आला आहे.

राज्यातील प्रत्येक शाळेतील प्रत्येक वर्ग डिजीटल व्हावा हे मानस साध्य करण्याकरिता जिल्हा तसेच शाळा स्तरावर CSR, लोकसहभाग आदि. माध्यमांचे सहकार्य घेण्यात येत आहे. राज्यातील धुळे जिल्हा हा १०० टक्के डिजीटल शाळा असलेला जिल्हा झाला असून अन्य जिल्हयांमध्ये देखील डिजीटल शाळा संदर्भात विशेष प्रयत्न होताना दिसत आहेत.

याच अनुषंगाने राज्य स्तरावरुन रोटरी साऊथ एशियन सोसायटी (RSAS) च्या सोबत राज्यातील १८,५१० शाळांमध्ये ई-लर्निंग सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबतचा सामंजस्य करार (MOU) करण्यात आला असून त्यानुसार पुढील ३ वर्षात राज्यातील १८,५१० शासकीय व खाजगी अनुदानित शाळांना डिजीटल शाळा होण्याकरिता रोटरी सहाय्य करणार आहे. याकरिता राज्यातील प्राधान्याने शासकीय व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांमधून शाळांची निवड करण्यात येणार असून नंतर खाजगी अनुदानित शाळांची निवड करण्यात येईल. तथापि, याकरिता ज्या शाळांनी संदर्भ क्र. २ येथे नमूद केल्याप्रमाणे या शासन परिपत्रकानंतर किमान एक वर्ग डिजीटल केलेला आहे, अशा शाळांतील अजून एक वर्ग डिजीटल करण्याकरिता रोटरी (RSAS) सहकार्य करेल.

रोटरीतर्फे शाळा डिजीटल करण्याकरिता खालील सुविधा उपलब्ध करुन दिल्या जाणार आहेत.

i. Hardware-Set of Minimum 32'' HD Ready LED TV (32T7260HDI, 2 x HDMI, 2 x USB) or Minimum 32'' Smart TV
ii. Android Stick 10 GB minimum capacity (MK809IV A RK3188 Quad Core Android 4.2 Mini PC & TV Dongle w/ HDMI Output 2GB+8GB DLNA Wi-Fi Bluetooth – Black)

रोटरी सोबतच्या सामंजस्य करारामुळे राज्यातील शाळा डिजिटल शाळा होण्यास मोठे सहकार्य मिळणार आहे. याकरिता रोटरी तर्फे लिंक तयार करण्यात आली आहे, ज्या शाळा अजूनपर्यंत (हे शासन परिपत्रक निर्गमित होईपर्यंत) डिजीटल झालेले नाहीत अशा शाळांनी दि. ९ जानेवारी २०१७ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणे शाळेतील एक खोली डिजीटल करुन या लिंकवर जाऊन नोंदणी करावी. (रोटरी लिंक http://rotaryteach.org/e_learn_mha_gov) अशा रितीने पात्र ठरणाऱ्या शाळांना

रोटरीतर्फे उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे सुविधा उपलब्ध करुन देणेबाबतची कार्यवाही करण्यात येईल. यासंदर्भातील संपूर्ण अधिकार रोटरी (RSAS) यांना राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०४१९१६२९३६७८२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Baban
Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2017.04.19 16:33:40 +05'30'

**( बी.आर. माळी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मा. आयुक्त, (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत :-** माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव

१) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक प्रशिक्षण परिषद, मुंबई
२) संचालक, विद्या प्राधिकरण, पुणे.
३) शिक्षण संचालक, (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, पुणे
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) शिक्षण संचालक (अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण) शिक्षण संचालनालय, पुणे
६) आयुक्त महानगरपालिका (सर्व)
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८) सर्व विभागीय संचालक/शिक्षण उपसंचालक
९) मुख्याधिकारी सर्व नगरपालिका/नगरपरिषदा
१०) प्राचार्य, शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था (डायट) (सर्व)
११) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/निरंतर) जिल्हा परिषद (सर्व)
१२) शिक्षण निरीक्षक उत्तर/दक्षिण/पश्चिम
१३) निवडनस्ती (प्रशिक्षण).